**रमाई आवास घरकुल योजने अंतर्गत घरकुलाकरिता द्यावयाच्या अनुदानाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक रआयो-२०१६/प्र.क्र.५७८/बांधकामे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक : ७ जानेवारी, २०१७.**

<u>संदर्भ</u>:- १) शासन ज्ञापन, सा.न्या.व वि.स.वि. क्र.रआयो-२०१४/ प्र.क्र.१०/ बांधकामे, दिनांक १८.७.२०१४.
२) शासन निर्णय, सा.न्या.व वि.स.वि. क्र. रआयो-२०१६/प्र.क्र.५७८/बांधकामे, दि.३०/९/२०१६.

**<u>प्रस्तावना :-</u>**

अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांसाठी घरकुल योजना दिनांक १५ नोव्हेंबर, २००८ च्या शासन निर्णयान्वये जाहिर करण्यात आली असून वरील संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये सदर घरकुल योजनेची प्रत्यक्ष अंमलबजावणी सुरु करण्यात आलेली आहे. सदर योजनेंतर्गत घराच्या अनुदानाची किंमत मर्यादा ग्रामीण क्षेत्रासाठी रु.७०,०००/- इतकी होती. सदर योजना ही ग्राम विकास विभागामार्फत राबविण्यात येत असलेल्या इंदिरा आवास योजनेच्या धर्तीवर राबविण्यात येत आहे. ग्राम विकास विभागाने इंदिरा आवास योजनेच्या अनुदानाच्या किंमतीत दि.७ नोव्हेंबर, २०१३ च्या शासन निर्णयान्वये दि.१ एप्रिल, २०१३ पासून रु.७०,०००/- वरुन रु.१,००,०००/- इतकी वाढ केलेली आहे. त्याच धर्तीवर या विभागामार्फत अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांसाठी राबविण्यात येत असलेल्या रमाई आवास योजनेंतर्गत ग्रामीण भागातील घरकुलाच्या अनुदानाची किंमत दि.१ एप्रिल, २०१३ पासून रु.७०,०००/- वरुन रु.१,००,०००/- इतकी करण्यास संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) च्या धर्तीवर रमाई आवास योजनेच्या निकशात बदल करण्यात आले असून सामाजिक आर्थिक व जात सर्वेक्षण २०११ यादीच्या निकषाबाहेरील प्राधान्यक्रम यादीतून निवडण्याबाबत निर्देश देण्यात आलेले आहेत.

प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) मंधील लाभार्थ्यांना ग्रामविकास व जलसंधारण विभागाच्या दिनांक १४/१०/२०१६ शासन निर्णयान्वये देण्यात येणारे अनुदान विचारात घेऊन रमाई आवासयोजनेतंर्गत लाभार्थ्यांच्या अनुदानात सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

शासन निर्णय दिनांक ३० सप्टेंबर, २०१६ च्या निकषानुसार निवडण्यात येणाऱ्या रमाई आवास योजनेच्या लाभार्थ्यांना पुढील प्रमाणे अनुदान देण्याबाबत निर्णय घेण्यात येत आहे :-

१) रमाई आवास योजनेंतर्गत (ग्रामीण), प्रति घरकुल (शौचालय बांधकामासह) अनुदान साधारण क्षेत्र रु.१,३२,०००/- व नक्षलग्रस्त व डोंगराळ क्षेत्रासाठी (शौचालय बांधकामासह) रु.१,४२,०००/- निश्चित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२) शौचालय बांधण्यासाठी लाभार्थ्यांना देण्यात आलेल्या रु.१२,०००/- ची प्रतिपूर्ती, पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाकडून करण्यात येईल.

३) प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) मधील लाभार्थ्यांप्रमाणे रमाई आवास योजनेच्या लाभार्थ्यांना MGNREGA अभिसरणाद्वारे साधारण क्षेत्रासाठी रु.१७,२८०/- व नक्षलग्रस्त व डोंगराळ क्षेत्रासाठी रु.१८२४०/- अनुदान उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४) रमाई आवास योजनेसाठी शहरी भागातील (महानगरपालिका, नगरपालिका, नगरपरिषद आणि नगरपंचायत) वैयक्तिक लाभार्थ्यांकरीता प्रधानमंत्री आवास योजना (शहरी) प्रमाणे (३० चौ.मी. घरकुल बांधकामासाठी) लाभाची रक्कम व लाभार्थ्यांची पात्रता त्यामध्ये बदल करण्यास मान्यता देण्यात येत असून त्यानुसार वार्षीक उत्पन्न रु.३.०० लक्ष पर्यंत असलेल्या लाभार्थ्यांना घरकुल बांधकामासाठी रु.२.५० लक्ष अनुदान अनुज्ञेय राहिल.

५) वरील प्रमाणे ग्रामीण व शहरी भागातील सुधारित अनुदान सन २०१६-१७ या आर्थिक वर्षा पासून लागू राहील. तसेच ज्या लाभार्थ्यांना यापुर्वी घरकुल मंजूर झाले आहे परंतु पहिला हप्ता सन २०१६-१७ मध्ये दिला आहे त्यांनाही सुधारित अनुदान अनुज्ञेय राहील.

२. नरेगा बाबत वेळोवेळी आयुक्त नरेगा यांच्या सुचनांनुसार कार्यपध्दती अवलंबविण्यात यावी. जिल्हा स्तरावर जिल्हाधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी या योजनेकरीता लाभार्थ्यांना सुधारीत केलेल्या दरानुसार मस्टरव्दारे मजूरी देण्याची आवश्यक ती कार्यवाही करावी.

३. पंतप्रधान आवास योजनेच्या धर्तीवर अभिसरणानुसार रमाई आवास योजनेकरिता नरेगा अंतर्गत जॉब कार्डधारक लाभार्थी यांना ई-मस्टरव्दारे मजूरी देय राहील. त्याकरिता लाभार्थ्यांनी गटविकास अधिकाऱ्याकडील मस्टर व काम सुरु करण्याच्या आदेश प्राप्त झाल्यावर काम सुरु करणे बंधनकारक राहील. ही रक्कम अनुदान स्वरुपात नसून मजूरी प्रदानाकरिता मस्टरव्दारे जेवढे काम होईल तेवढे नरेगाच्या EFMS व्दारे शाखा अभियंता, जिल्हा परिषद यांच्या मुल्यांकनानंतर मजूराच्या बँक खात्यावर गटविकास अधिकारी यांच्यामार्फत जमा होईल. सदर योजना अभिसरणाव्दारे फक्त ग्रामीण भागातील घरकुलाकरिता राहील.

४. सदर शासन निर्णयास ग्रामविकास व जलसंधारण विभाग, नियोजन विभाग (रोहयो) या विभागांची सहमती घेण्यात आलेली आहे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.८/२०१७/व्यय-१५ दि.०३/०१/२०१७ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकतेस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१७०१०७१७०३१९५६२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justic and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d81b5c910bad5837d7f88ac97a75b312f0e5744ecbdc45b7704dcb27f5d4dfef, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2017.01.07 17:07:02 +05'30'

**( अनिल कों.आहिरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.

२) मा.सभापती, विधान परिषद, विधान भवन, मुंबई.
३) मा.अध्यक्ष, विधानसभा, विधान भवन, मुंबई.
४) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा.मंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव
६) मा.राज्यमंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव
७) सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
८) सर्व विधानसभा/विधान परिषद सदस्य
९) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.
१०) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) प्रधान सचिव,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) प्रधान सचिव,नियोजन (रो.ह.यो) विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) प्रधान सचिव,गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) प्रधान सचिव,नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष- ग्रामीण गृहनिर्माण कक्ष, नवी मुंबई.
१७) सर्व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा.
१८) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
१९) सर्व जिल्हाधिकारी,
२०) सर्व महानगरपालिका आयुक्त,
२१) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
२२) सर्व मुख्याधिकारी नगरपालिका / नगरपरिषद.
२३) प्रादेशिक उपायुक्त, (सर्व) समाजकल्याण.
२४) सहायक आयुक्त (सर्व) समाजकल्याण विभाग.
२५) सर्व सह सचिव/उपसचिव/अवर सचिव, सामाजिक न्याय विभाग,मंत्रालय मुंबई
२६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १ / २, मुंबई/नागपूर
२७) वित्त विभाग (व्यय-१४/अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई
२८) संचालक, लेखा व कोषागारे, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पॉईट, मुंबई
२९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
३०) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
३१) निवडनस्ती (बांधकामे)